**महाराष्ट्र समुह विद्यापीठ अधिनियम, २०१८ मसुद्यावर चर्चा विनिमय करण्याकरिता उच्च शिक्षण क्षेत्रातील तज्ञ व्यक्तिची समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. रूसायो-२०१८/प्र.क्र. २०७/विशि३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०७ जुलै, २०१८

**प्रस्तावना:-**

उच्च शिक्षणाची संधी सर्व घटकांना प्राप्त होणे, उच्च शिक्षण सर्व समावेशक करणे आणि उच्च शिक्षणात उच्चत्तम गुणवत्ता निर्माण करणे यासाठी केंद्र शासनाने सुरु केलेला राष्ट्रीय उच्चत्तर शिक्षा अभियान (रुसा) कार्यक्रम राज्यामध्ये अंमलात आणण्यास शासन निर्णय क्र.रुसायो-२०१३/ प्र.क्र.४१८/विशि-३, दि.२० मे, २०१५ अन्वये शासनाची मान्यता देण्यात आली आहे. या कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून ६०% निधी प्राप्त होत असून ४०% निधीची तरतूद शासनास करावयाची आहे. महाराष्ट्र राज्य रुसा परिषदेची बैठक दि.९ मे, २०१८ रोजी संपन्न झाली. या बैठकीमध्ये समूह (क्लस्टर) महाविद्यालयाच्या विधेयकच्या मसुद्यावर सांगोपांग चर्चा झाली. महाराष्ट्र राज्य रुसा परिषदेने विधेयकाच्या मसुद्याला मान्यता दिली आहे.रूसा परिषदेच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार संचालक, रुसा यांनी राज्यामध्ये समूह विद्यापीठ (Cluster University) स्थापन करण्यासाठी प्रख्यापित करावयाच्या अधिनियमाचा मसूदा शासनास सादर केला आहे. प्रस्तावित कायद्याच्या मसुदा यावर चर्चा करण्यासाठी व त्याअनुषंगाने अनुषांगीक बदल करण्यासाठी व्यक्तींचा समावेश असलेली समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्यामध्ये समूह विद्यापीठ (Cluster University) स्थापन करण्यासाठी Maharashtra Cluster Universities Act, २०१८ या मसुद्यावर वर चर्चा विनिमय करण्यासाठी व त्यानुसार अनुषांगीक बदल करण्यासाठी उच्च शिक्षण क्षेत्रातील तज्ञ व्यक्तिंचा समावेश असलेली खालील प्रमाणे समूह विद्यापीठ स्थापन करण्याबाबतची समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १. | डॉ. रावसाहेब काळे, माजी कुलगुरु, सेंट्रल युनिव्हर्सिटी ऑफ गुजरात, प्राध्यापक, जवाहरलाल नेहरु विद्यापीठ, दिल्ली. | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ३. | प्रा. व्ही. एन. राजशेखरन पिल्लई, प्रो. व्होस्ट, सोमैय्या विद्याविहार, Ex-Chairman UGC, VC-IGNOU. | सदस्य |
| ४. | प्रा. विजय खोले, माजी कुलगुरु, मुंबई विद्यापीठ | सदस्य |
| ५. | प्रा. अनिल राव, निव़त्त प्राचार्य, मु.जे.महाविद्यालय, जळगाव | सदस्य |
| ६. | आनंद मापुसकर, शिक्षण तज्ञ, मुंबई | सदस्य |
| ७. | सहसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई | सदस्य |
| ८. | डॉ. विजय जोशी,चीफ कन्सल्टंट,रुसा | सदस्य |
| ९. | संचालक, उच्च शिक्षण, पुणे | समन्वयक |

अ) संचालक, रुसा यांनी सादर केलेला समूह विद्यापीठ अधिनियमावर समितीने विचार विनिमय करुन त्यानुसार आवश्यक त्या अनुषंगिक शिफारशी शासनाला एक महिन्यात सादर कराव्यात.

ब) समितीच्या बैठका सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे येथे घेण्यात येतिल.

क) समितीमधील अशासकीय सदस्याचे मानधन, प्रवास व इतर अनुषंगिक भत्ते सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे यांनी देणे बंधनकारक राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८०७०७१४२२५४७६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2018.07.13 18:16:50 +05'30'

**( सिध्दार्थ खरात )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा विद्यापीठाचे कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान.
४. संचालक, उच्च शिक्षण, पुणे
५. डॉ. रावसाहेब काळे, माजी कुलगुरु, सेंट्रल युनिव्हर्सिटी ऑफ गुजरात, प्राध्यापक, जवाहरलाल नेहरु विद्यापीठ, दिल्ली.
६. प्रा. व्ही. एन. राजशेखरन पिल्लई, प्रो. व्होस्ट, सोमैय्या विद्याविहार, Ex-Chairman UGC, VC-IGNOU.

७. प्रा. विजय खोले, माजी कुलगुरु, मुंबई विद्यापीठ

८. प्रा. अनिल राव, निव़्त्त प्राचार्य, मु.जे.महाविद्यालय, जळगाव

९. आनंद मापुसकर, शिक्षण तज्ञ, मुंबई

१०.सहसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई

११.डॉ. विजय जोशी,चीफ कन्सल्टंट,रुसा

१२.मा. अपर मुख्य सचिव (उ.व.तं.शि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१३.सह सचिव (विशि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१४.कार्यासन अधिकारी (साशि-१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५.निवडनस्ती.